# तीन हत्ती

(प्राणी, माणूस आणि युद्धाची सत्यकथा)



युकियो त्सुचिया

चित्र: टेड लेविन

# तीन हत्ती

(प्राणी, माणूस आणि युद्धाची सत्यकथा)



युकियो त्सुचिया

चित्र: टेड लेविन

मनुष्य कायमच युध्दरहित विश्वाचे स्वप्न बघत आलेला आहे. पण हे स्वप्न केवळ स्वप्न म्हणूनच राहील आहे.

शांतता निर्माण करण्यायचा कामात राजकारणी, राजदूत, विदुषी, सैन्यातील लोक यांचा सग मोठा असतो. पण कोणत्याही क्षणी अणुयुद्ध पेटू शकेल अशा या काळात ही जवाबदारी फक्त त्यांच्याकडे चालू शकेल?

युद्ध टाळायची आणि शांतता प्रस्थापित करण्याची जवाबदारी ही प्रत्येकाने स्वतःची जवाबदारी म्हणून स्वीकारली पाहीजे आणि ती पार पाडण्याचा प्रयत्न देखील केला पाहिजे. एकट्या माणसाची शक्ती कमी वाटू शकते, पण थेंबा थेंबाने तळे साचते, त्याचप्रमाणे अनेक लोक एकत्रित येऊन निर्माण होणारी शक्तीदेखील अचाट असणार आहे.

या प्रयत्नापैकी एक म्हणजे, गेली २२ वर्षे मी युकियो त्सुचिया यांनी सदतीस वर्षांपूर्वी लिहिलेल्या "तीन हत्ती" या कथेचे रेडिओवरून, टीवीवरून आणि माझ्या व्याखयानांमधून कथन करत आले आहे.

दुसऱ्या महायुद्धाचा अखेरच्या काळात टोक्योवर बरेच हवाईहल्ले होत होते. तशा परिस्थितीत प्राणिसंग्रहणालयाच्या अधिकारयांना स्वतःचा काळजावर दगड ठेवून बऱ्याच प्राण्यांना मारून टाकावे लागले. प्राणिसंग्रहणालय जर हल्ल्यात सापडले, पिंजरे तुटले आणि काही प्राणी जर मोकाट सुटले तर गोंधळ माजेल अशा भितिने. "तीन हत्ती" ही कथा त्या वेळच्या उएनो प्राणिसंग्रहणालयातील ३ हत्तींच्या अशा मृत्यूची कथा आहे.

ही कथा लोकांना सांगणे ही काही फार मोठी गोष्ट नसेल कदाचित, पण २२ वर्षे सतत करत आलेल्या या शांतताप्रसारसाठीच्या धडपडीचे आता चीज होताना मला दिसत आहे. युद्धामुळे निर्माण होणारे दुःख आणि दारिद्रय बघून, युद्धाचे भयाण स्वरूप पाहून, त्याची अर्थहीनता जाणून मोठ्याच्या आणि मुलांच्या मनात शांततेविषयी एक प्रचंड आस्था निर्माण होताना दिसत आहे.

युद्धाचा पूर्ण इतिहास आणि युद्धाविषयीचे विचार मोकळेपणे मांडून मुलांमध्ये शांततेविषयीची ओढ जागृत करणे हीच मोठ्यांनी मुलांना दयावी अशी सगळयात सुंदर भेट आहे असे मला वाटते.

ही कथा साऱ्या जगात वाचली जाऊन सर्वांच्या मनात युद्धाप्रति तिरस्काराची भावना आणि शांततेविषयीची ओढ जास्तीत जास्त वळकट व्हावी हीच माझी इच्छा आहे. आज एकात पेरली गेलेली ही भावना वाढीस लागून यथावकाश त्याचा विषाल वृक्ष होईल आणि सगळ्यांनाच तो आपल्या छायेखाली सामावून घेईल अशी मला आशा आहे.

**(चिएको आकियामा (रेडिओ, टीव्ही समालोचक आणि टीकाकार, टोकियो १९८८)**

(१९५१ साली लिहिल्या पुस्तकाची ही ७७वीं आवृत्ती आहे)




उएनो प्राणिसंग्रहालय चेरीच्या फुलांनी बहरले आहे. हवेचा झुळूकेवर स्वार झालेल्या फुलांच्या पाकळ्या सूर्याचा प्रकाशात चमचम करीत आहेत. अशा रम्य वातावरणात, चेरीच्या झाडाखाली, आत जाऊ पाहणाऱ्या लोकांची ही गर्दी झाली आहे.

आत २ हत्ती खेळ दाखवून लोकांच्या टाळ्या मिळवीत आहेत. आपल्या लांब सोंडेचे तुतारी करून हुंकार काढत तेथे पडलेल्या ओंडक्यांच्या कडे कडेने चालत आहे.





या गजबजाटापासून थोड्याच अंतरावर सहसा लोकांची नजर न पडणारी अशी एक समाधी आहे. युद्धकाळात मृत्यूमुखी पडलेल्या प्राणिसंग्रहालयातील प्राण्यांची समाधी. समाधीचा परीसर अगदी शांत आहे. सूर्यकिरणांत न्हाऊन समाधी उबदार झाली आहे.

एके दिवशी प्रेमाने त्या समाधीची साफसफाई करणाऱ्या तेथील एका कर्मचाऱ्याने मला तेथे पुरलेल्या तीन हत्तींची गोष्ट सांगितली.

"सध्या या प्राणिसंग्रहालयात ३ हत्ती आहेत. पण बर्याच वर्षांपूर्वी वेगळे ३ हत्ती येथे होते. जॉन, टॉकी आणि वॅनली अशी त्यांची नावे. त्याच काळात जपानचे युद्ध चालू होते. परिस्थिती अधीक विघळत चालली होती. टोक्योवर दिवस रात्र पावसाप्रमाणे बॉम्ब पडत होते.



असे बॉम्ब जर प्राणिसंग्रहालयाच्या आवारात पडून पिंजरे तुटले आणि प्राणी मोकळे सुटले तर गोंधळ उडेल. अशा विचाराने सैन्याच्या हुकुमावरून वाघ, सिंघ, बिबट, अस्वल, सर्व मोठे सर्प यांना अन्नातून वीष घालून मारण्यात आले.

असे करता करता या तीन हत्तींनाही मारण्याची वेळ आली. जॉनला आधी मारण्याचे ठरले. बटाटे हे जॉनचे आवडते खाद्य. चांगल्या बटाटयांमध्येच काही वीष घातलेले बटाटे मिसळून जॉनसमोर ठेवण्यात आले. पण जॉन अत्यंत हुशार हत्ती होता. त्याने चांगले बटाटे वेचून खाल्ले आणि वीष असलेले बटाटे सोंडेने तोंडापाशी नेवून न खाता टाकून दिले.



प्राणिसंग्रहालयाचे अधिकारी म्हणाले, "आता वीष त्याचा शरीरात टोचण्या शिवाय दुसरा मार्गच नाहीये."

मग घोड्यांना औषधे टोचण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या मोठ्या सुया आणल्या गेल्या. पण जॉनच्या त्या जाड कातडीसमोर सुयांचेही काही चालले नाही. सगळ्या काटाकट तुटून पडल्या. हा पर्याय देखील निकामी ठरल्यामुळे अधिकाऱ्यांनी जॉनला उपाशी ठेवून मारण्याचे ठरवले. बिचारा जॉन, उपसामुळे सतरा दिवसांतच मरून गेला.



मग टॉकी आणि वॅनलीची पाळी आली. हे होणंही हत्ती नेहमी प्रेमळ नजरेने लोकांकडे बघत. अतिशय चांगल्या स्वभावाचे हत्ती होते दोघे. टॉकी आणि वॅनलीला जिवंत ठेवण्यासाठी अधिकाऱ्यांची बरेच पर्याय पडताळून पाहिले. त्यांना टोक्योपासून दूर, उत्तरेकडील सेनदाईच्या प्राणिसंग्रहालयात पाठवण्याचा देखील विचार केला. पण सेनदाई बॉम्ब हल्ल्यांतून सुटेलच कशावरून? सेनदाईवर जर बॉम्ब हल्ला झाला आणि टॉकी आणि वॅनली मोकाट सुटले तर? तसे झाले तर अनर्थ ओढवेल.

शेवटी टोकी आणि वॅनलीला देखील मारण्याचा निर्णय पक्का झाला. त्यांना उपाशी ठेवले गेले. दिवसेंदिवस ते दोघे बारीक, अशक्त होत गेले. पिंजऱ्याजवळून जर कुणी कर्मचारी गेला तर कसेबसे थरथरत आपल्या पायांवर उभे राहत. जणू काही कळवळून कर्मचाऱ्याकडे अन्नाची भीक मागत, "आम्हाला खायला दया. कृपा करून थोडे पाणी पाजा." कधीकाळी गोंडस दिसणारे त्यांचे छोटे-छोटे डोळे, आता त्यांचा सुकलेल्या चेहऱ्यावर रबरचे छोटे गोलाकार चेंडू बसवल्यासारखे दिसत होते. पंख्यासारखे कान शरीराच्या मानाने फारच मोठे वाटू लागले होते. कधीकाळी अवाढव्य, बलशाली असलेले हे हत्ती आता अगदी दयनीय अवस्थेत होते.



आतापर्यंत हत्तींच्या माहूताने स्वतःच्या मुलाप्रमाणे त्यांची काळजी घेतली होती. पण आता तो त्यांचा पिंजऱ्यासमोर उभा राहून फक्त रडू शकत होता. एक दिवस टॉकी आणि वॅनली कसेबसे उभे राहत माहूताजवळ आले आणि शरीरातील उरली सुरली सगळी शक्ती एकवटून त्यांनी अन्न पाणी मिळवण्याचा एक शेवटचा प्रयत्न केला. आपल्या मागच्या पायांवर उभे राहत, पुढचे दोन्ही पाय जमतील तेवढे हवेत उचलत, सोंड हवेत उंच करत "जयजयकार" करून दाखवला. त्यांना वाटले, नेहमीचा "जयजयकार" करून दाखवला की आपला माहूत आपल्याला नक्की काहीतरी खायला देईल, पाणी पाजेल.





ते पाहून माहूताला आता तसेच उभे राहणे अशक्य झाले. "टॉकी, वॅनलीची" असे म्हणत तो अन्नाच्या कोठाराकडे पळाला. त्यांच्यासाठी अन्न, पाण्याचा बादल्या घेऊन आला आणि ते सगळे त्याने त्या दोघांच्या पायांशी टाकले. बारीक झालेल्या त्यांच्या पायांना घट्ट मिठी मारत तो म्हणाला, "हे घ्या.... तुमच्यासाठी खाणं आणलय ...... प्यायला पाणी आणलय ..... घ्या ना..... "



हा प्रकार बघितलेल्या बाकीच्या कर्मचाऱ्यांनी डोळ्यांवर झापडे ओढली आणि जणू आपण काहीच बघितले नाही असे दाखवले. तेथला सर्वोच्च अधिकारी देखील काहीही न बोलता नुसता बसून राहिला. या दोघा हत्तींना कुणीही काहीही खायला घालायचे नाही, पाणी पाजायचे नाही असे ठरले होते. पण खरेतर प्रत्येकजण मनापासून प्रार्थना करीत होता, "आणखी एक दिवस यांनी जगाव, युद्ध संपावे आणि यांचा जीव वाचावा."

काही दिवसांतच टॉकी आणि वॅनली इतके अशक्त झाले की त्यांना हालचाल करणे देखील अशक्य होवून गेले. दोघेही कुशीवर पडून राहील. त्यांची दृष्टी कमकुवत झाली. वर आकाशात विहार करणारे पांढरे ढग देखील त्यांना आता दिसू शकत नव्हते. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे, त्यांचे डोळे एरवी कधी वाटले नसतील इतके सुंदर भासत होते.

आपल्या आवडत्या हत्तींची अशी अवस्था माहूताला बघवेना. त्यांच्याजवळ जायची ताकदच त्याच्यात राहिली नाही. इतर सगळ्यांची अवस्था देखील सारखीच होती. सगळेजण हत्तींसमोर जाणे टाळत होते.





दोन आठवडयांनी टॉकी आणि वॅनली मरून गेले. गजांवर रेलून, सोंड हवेत उंचावर एकेकाळी आपल्याला खायला घालणाच्या लोकांना "जयजयकार" करून दाखवत, त्यांच्याकडून काही खायला मिळेल अशी वेडी आशा करतच दोघांचा प्राण निघून गेला होता.

"गेले, दोघेही गेले..... " माहूत त्यांना बघून पिंजऱ्यासमोरून निघून गेला. खाद्यामध्ये तोंड लपवत, हातांची घट्ट मूठ टेबलावर आपटत खूप रडला.

बाकीचे कर्मचारी पिंजऱ्याकडे पळाले. टॉकी आणि वॅनलीच्या सुकलेल्या मृत शरीरानं हलवून जणू त्यांना परत जावे करण्याचा प्रयत्न करू लागले. अश्रू पुसत, आपल्या लाडक्या हत्तींच्या कृश शरीराला कुरवाळत दुःखाने व्याकूळ झाले.



आणि त्याच वेळी डोक्यावरील स्वच्छ, निळ्या आकाशात शत्रूंच्या विमानांचा गोंगाट पुन्हा सुरू झाला. टोक्योवर बॉम्बहल्ला सुरू झाला होता. हत्तींना कवटाळीत, आकाशाकडे मुठी वळीत सगळे ओरडले, "थांबवा हे युद्‌ध.... जगातील सगळी युद्‌ध थांबवा...."



नंतरच्या तपासणी हत्तींच्या पोटात काहीच सापडले नाही. मोठ्या घनगरल्यासारख्या पोटात पाण्याचा थेंबही नव्हता."

शेवटी अश्रूभरल्या डोळ्यांनी त्या कर्मचाऱ्याने आपली गोष्ट संपवली. "आता जॉन, टॉकी आणि वॅनली या समाधीखाली शांतपणे झोपलेले आहेत."

तो समाधीवरून मायेने हात फिरवीत राहिला. एकीकडे हलकेच बर्फवृष्टी व्हावी त्याप्रमाणे चेरीच्या फुलांच्या पाकळ्या समाधीवर पडत राहील्या.

